# खडक

**-- चं.प्र.देशपांडे.**

रंगभूमीवर काहीही नसले तरी चालेल. योग्य तेव्हा लोक तिथे एक प्रचंड खडक आहे असे मानायला लागले म्हणजे झाले. एक सर्कशीतला विदूषक (सवि) -- शक्य तितका बुटका, हातात सर्कशीतली काठी, एक जुन्या संस्कृत नाटकातला वगैरे असा ब्राह्मण विदूषक ( नावि ) आणि एक लोकनाट्यातला विदूषक (लोवि) .

लोविः मी लोकनाट्यातला विदूषक.

नाविः मी सुसंस्कृत नाट्यातला विदूषक.

सविः मी सर्कशीतला.

तिघेहीः (एकमेकांना ) नमस्कार !

लोविः स्टार्ट ?

सविः येस ! ( कोलांटी मारतो.)

नाविः अरे, संस्कृतात बोल रे बाबा ! तुझं ते इंग्रजी आम्हाला कळत नाही.

लोविः स्टार्ट म्हणजे सुरू.

नाविः मग सुरूच म्हण.

सविः ' सुरू ' ? हा काय शब्द आहे ? जसं काय निमुळतं होत गेलेलं सुरूचं झाडच ! हुडुत !

लोविः हो, पण सुरू हा शब्द सुरूच्या झाडासारखा आहे म्हणून तो काही अश्लील ठरू शकत नाही आणि आपल्याला फक्त अश्लील शब्दच बोलायची बंदी आहे.

नाविः अरे कसला विषय काढलात रे बाबांनो ! चांगला मस्तपैकी बासुंदीपुरीचं जेवण करून, वर जिलेबी, मसालेभात आणि बदामाचा शिरा खाऊन, वर फलाहारानं तोंडाला जरा गारवा देऊन आलो होतो आणि पाहात होतो इथं कुठं चांदी लावलेल्या मसालेदार पानाचं दुकान आहे का-- ( मधेच एक सुखासीन ढेकर देत)... अरेरेरे ! काय विषय काढलात। काय विषय काढलात !

लोविः अहो नाटकातले विदूषक ! तुम्ही संवाद पाठ म्हणता ही गोष्ट फार चांगली आहे, पण तुम्ही तुमच्या त्या कालिदासाला किंवा भासाला -- नको, भासाला नको, कालिदासालाच स्मरून सांगा की, यातला कुठला पदार्थ आयुष्यात कितीदा तुमच्या वाट्याला आला आहे ?

नाविः खरं म्हणजे साली आपल्याला आत्ता भूक लागलेली आहे आणि थोडी चटणीभाकर मिळाली तर फार फार भलं होण्यासारखं आहे. ( सवि टाळ्या पिटत उड्या मारतो.)

लोविः पण दरिद्री जनतेला तुमच्यासारख्या विदूषकांची अतीव म्हणजे अत्यंत आवश्यकता आहे. दरिद्री जनतेला पदार्थांची अशी खानेसुमारीसारखी नावं ऐकून अगदी पोटभर हसू येतं. हसण्यासाठी तर बिचारी जनता पोटाला चिमटा घेऊन नाटकाला आलेली असते !

नाविः तर आता नाटकाला जरा चिमटा घेऊन मला काही पोटाला देता काय ?

लोविः नाही. आत्ता नाही. हे नाटक संपेपर्यंत आपल्याला कुठंही जाता येणार नाही. आणि विदूषकाचं काम उपाशीपोटीच अधिक रंगतं, असं आजपर्यंतचा आपल्या देशाचा इतिहास सांगतो.

नाविः ठीक आहे...तर बासुंदी अशी छान होती म्हणता...वा, वा, वा ! काय तो दाट सुगंध...काय त्या उदबत्त्या...

लोविः काय तो धूप ! बस्स !
( सवि दणादण कोलांट्या मारत सुसाट हसतोय.)
ते असो ! काय ! ते असो ! आता आपल्याला जरा पोटाबिटाहून अधिक महत्त्वाच्या विषयावर बोलायचं आहे आणि ते म्हणजे ...

नाविः अरे नाही रे बाबा, पोटाहून अधिक महत्त्वाचा असा विषय असूच कसा शकेल ? मला फार भूक लागलीय रे बाबा, भूक लागलीय ! हे मी तुला अगदी माझ्या पोटातली आतडी पिळवटून सांगतो. तर कृपा करून आता त्याहून जास्त महत्त्वाचा विषय काढू नकोस. (सवि येऊन नाविच्या डोक्यावर काठी

मारतो--यासाठी अर्थात त्याला उडी मारावी लागते.)

लोविः हे नाटक आपल्याला पार पाडायचंय की नाही ? की आपल्याला नुसता भुकेचाच विचार करायचाय एवढ्या लोकांसमोर ? लवकरच हे नाटक संपेल, मग बेलाशक तू 'स्टार ऑफ महाराष्ट्र ' मध्ये जाऊन मिसळपाव खात बस. अगदी डबल मिसळ आणि डबल पाव खात बस.

सविः हो,हो,हो ! सुरू कर ना लवकर !

लोविः हां ! तर तुझ्यापासून सुरुवात करू. तुझं व्यक्तिमत्व कुठाय दाखव बरं !

सविः व्यक्तिमत्व ! ( एकदम खिशात हात घालतो. पण एकूणच शब्द आणि अवघडपणा लक्षात येताच दचकतो.) व्यक्तिमत्व ? ( बुचकळ्यात पडून ) व्यक्तिमत्व ऽ ...हां हां व्यक्तिमत्व ! अरे, मग व्यक्तिमत्व म्हण ना ! व्यक्तिमत्व काय व्यक्तिमत्व ! व्यक्तिमत्व म्हणायचं ! हे बघ एका मिण्टात दाखवतो.

( सवि रंगमंचाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत कोलांट्या मारत जातो. इथे पार्श्वसंगीत म्हणून सर्कशीतला बॅंड वाजवावा.)

नाविः अरे नको रे बाबा असे श्रम घेऊस ! इकडे माझ्या पोटाची आतडी पिळवटतायत बघ.

( लोवि नुसता रागाने बघतो.)

.. नाही नाही. बासुंदी अशी झकास जमलीवती म्हणतोस...

( कोलांट्या संपवून पुढे येत असलेल्या सविकडे पाहात लोवि उभा.)

अगदी श्रीखंडाइतकी सुंदर...

लोविः ( सविला.) हे काय ?

सविः ऑं ? हे काय म्हणजे ? अरे, तूच मला माझं व्यक्तिमत्व दाखवायला सांगितलंस ना ! तुला काय स्मृतिभ्रंश झालाय की काय ?

लोविः स्मृतिभ्रंश ? म्हणजे ? ( नाविला ) अहो संस्कृत ! ( स्वतःशीच ) च्यायला ! या सर्कशीला आमच्यापेक्षा अवघड शब्द कसा माहीत ?

नाविः स्मृतिभ्रंशाचं सोडा हो, तो झाल्याशिवाय आणि करून घेतल्याशिवाय विदूषकांना विदूषक आणि प्रेक्षकांना प्रेक्षक होताच येत नाही. आता मी माझं पोटसुध्दा विसरतोय तर ! नाही म्हणजे बासुंदी छानच होती ! पण तुम्हाला कुठलाही नवीन शब्द शिकवायची माझी इच्छा नाही, कारण त्या शब्दाचं पुन्हा तुम्ही सुरुचं झाडच करणार ! माझी खात्री आहे !

सविः ए स्मृतिभ्रंशा, त्या बामणाच्या नादी नको लागू, बडबड फार करतो ! मी आत्ता जे दाखवलं तेच माझं व्यक्तिमत्व ! मूर्खा, व्यक्तिमत्व या शब्दाचा अर्थ कळतो का ?

लोविः ( एकेक पाऊल तिरके तिरके टाकत, हातांनी कोलांट्यांची ॲक्शन करून ) हे तुझं व्यक्तिमत्व ?

सविः ( अभिमानानं छाती फुगवून ) येस !

लोविः धन्य तुमची ही बलदंड आकृती आणि धन्य तुमचं ते गतिमान व्यक्तिमत्व ! तुझ्यायला -- माझा नमस्कार ! ( नाविला ) तुमचं काय ?

नाविः आमचं काय ?

लोविः तुमचं काय म्हणजे तुमचं व्यक्तिमत्व कुठाय ?

नाविः ( विनयाने ) छे छे, आमचं कसलं व्यक्तिमत्व ? अरे राजाचं व्यक्तिमत्व विचारायचं, आमचा मित्र अशा त्या चारुदत्ताचं व्यक्तिमत्व विचारायचं, पाहिजे तर शर्विलकाचं विचारायचं आणि तुझा विचार करता, चारुदत्ताच्या चारुगात्री वसंतसेनेचं व्यक्तिमत्व विचारायचं ! माझं व्यक्तिमत्व ! माझं व्यक्तिमत्व ।। तुझ्या बुध्दिमत्तेची आणि तुझ्या रसिकतेची मला एकसमयावच्छेदेकरून कीव येते ! अक्षरशः कीव येते !

लोविः ए साल्या, नीट बोलतोस का दाबू तुझं नाक ?

नाविः आता तुझा आग्रहच आहे तर सांगतो बापडा. मी एक परमपवित्र, शुध्दात अतिशुध्द असा निष्पाप अग्निहोत्री ब्राह्मण ! माझं व्यक्तिमत्व काय असणार ! या सबंध देहात माझं पोट,एवढंच माझं व्यक्तिमत्व ! बाकी माझ्या व्यक्तिमत्वाला काहीही आकांक्षा नाहीत ! ...एऽऽ आत्ता मी अगदी नाइलाजानं पोटाचा विषय काढलाय रे बाबा. केवळ तुझ्या प्रश्नाचं उत्तर देण्यासाठी...बासुंदी खरोखरच छान होती...

लोविः तर तुझी बासुंदी गेली तुझ्या पोटात आणि तुझं पोट ऊर्फ तुझं व्यक्तिमत्व गेलं खड्ड्यात !-- आणि खड्डा गेला मातीत ! आता तुम्ही दोघं मिळून माझ्या व्यक्तिमत्वाबद्दल मला विचारा.

नावि/सविः सांग बघू तुझ्या व्यक्तिमत्वाबद्दल.

लोविः　काय म्हणालात ?

नाविः/सविः　दाखव बघू तुझं व्यक्तिमत्व.

लोविः　व्यक्तिमत्व ?

नावि/सविः　हं.

लोविः　माझं ?

नावि/सविः　हं,हं.

लोविः　माझं व्यक्तिमत्व ?

नावि/सविः　हो, हो.

लोविः　सांगू ?

नावि/सविः　हो.

लोविः　सांगू ?

नावि/सविः　हां.

लोविः　सांगू ?

नावि/सविः　हो, हां.

लोविः　( वाकून. कानावर हात ठेवून, कीर्तनातली तान गात असल्यासारखा हरदासी चेहरा करून जोरात...) माणसाच्याSS व्यक्तिमत्वाच्याSSबैलाला हो SS--बोला --( सगळे मिळून) माणसाच्या व्यक्तिमत्वाच्या बैलाला हो SS पुन्हा ....माणसाच्या व्यक्तिमत्वाच्या बै...हो ! ( लोवि दोघांना थांबवतो. कीर्तनात साथीदारांना थांबवावे तसे.)

नावि/सविः　हे काय ?

लोविः　मूर्खांनो, हेच माझ व्यक्तिमत्व म्हणजेच अँटि -- व्यक्तिमत्व !

नावि/सविः　म्हणजे व्यक्तिमत्वच !

लोविः　तुमच्या बुध्दीच्या बैलाला होऽ...

नावि/सविः　अरे बाबा, तुझं कुठाय ?

लोविः　तुमच्या अकलेच्या बैलाला होऽ...

नावि/सविः　ए ऽऽ

लोविः　गाढवांनो ! गप्प बसा ! आपल्या क्षुद्र व्यक्तिमत्वांचं काय घेऊन बसलात ! अजून इतर असंख्य, अगणित आणि अपरिमित व्यक्तिमत्वं शिल्लक आहेत...इथं एक प्रचंड खडक आहे असं समजा...काय ? आपापल्या बापांच्या पोरांनो, समजलात का ?

नावि/सविः　आँ ? हो, हो, इथं एक प्रचंड खडक आहे.

लोविः　कुठं ?

नावि/सविः　हा काय -- इथं एक प्रचंड खडक आहे.

लोविः　तर हा खडक पुरेसा प्रस्थापित तसंच एस्टॅब्लिशही झाला का ?

नावि/सविः　हो, हो. हा काय समोर केवढा तरी प्रचंड खडक आपलं भीमकाय अंग घेऊन पडलेला आहे.

लोविः　बास, बास. चला तर. पुढचा भाग आपण जरा खालच्या लेव्हलवर जाऊन पाहू या म्हणजेच आय मीन, प्रेक्षकांतून पाहू या.

सगळे मिळूनः　चला. (जाताना सवि मुद्दाम कशात तरी अडकून आदळतो.नावि आणि लोवि त्याला उचलून नेतात. इकडेतिकडे पाहात -- त्या खडकावर टिचक्या मारीत -- शोधकपणे असा एक मंत्री येतो.)

मंत्रीः　सालं आहे तरी कुठलं हे नवीन आश्चर्य ? एवढं सगळं जग फिरून आलो...सगळ्या आश्चर्यांवर उताणा--पालथा झोपून आलो...आणि हे एवढं जवळचं काय बघायचं राहिलं ? साली नाही तर त्या विदूषकानं आपली फोनवरून गंमत केलेली असायची ! म्हणे, ' आमचा खडक पाहून जा...हे एक जगातलं शेवटचं आश्चर्य आहे !' ( हसतो. ) नाही तरी एकूण आमची जनता लबाडच !

खडकः　ए ऽऽ

मंत्रीः　( दचकून ) अं ?

खडकः　होय, मीच तो खडक. मी बोलतोय हीच त्या शेवटच्या आश्चर्याची सुरुवात समज. तुझं नाव काय ?

मंत्रीः　आमचं कसलं नाव महाराज ! आम्ही फक्त एक पामर ! आमच्या जनतेचे गतानुगतिक दास आणि आपले

बंदे सेवक !

खडकः ए भडव्या, तू आम्हाला काय तुझी भोळीभाबडी, निरक्षर, अशिक्षित, दरिद्री, गाढव, कपाळकरंटी जनता समजलास काय? अगदी हसत आणि विनयानं बोलतोयस ते ?

मंत्रीः मग महाराज, आम्हाला उध्दटपणा शोभून दिसेल असं आपल्याला वाटतं काय ?

खडकः खरेपणा अधिक शोभून दिसेल ! तुझं नाव सांग.

मंत्रीः शामकांत तुपे.

खडकः मला तुझं नाव माहितीच होतं, पण आपल्यात हे आधीचे संवादही व्हायचे आहेत, हेही मला माहीत होतं-- म्हणूनच केवळ मी तुझं नाव विचारलं. समजलं का रे इंद्राच्या ऐरावता ?

मंत्रीः आपण विनाकारणच माझा अपमान करताहात.

खडकः एऽ मानापमानाच्या माणुसकीबाज गप्पेवाल्या मंत्र्या, तुझं पोट खणलं तर काय काय निघेल ते सांगू का रे ?

मंत्रीः ( दचकून ) अं ? काय म्हणालात ?

खडकः ऐक. सत्तावीस पोती हिरेमाणकं, साडेतेरा मण सोनं, नऊ लॉऱ्या भरून नोटा आणि नाणी आणि तीनशे चौदा बायकांचे गर्भ--तेही एकतर्फी इच्छेनं निर्माण झालेले -- या -- या तुझ्या पोटात आहेत. आहेत की नाहीत ?

मंत्रीः माझ्या ! अहो ते...( जीभ चावतो.) हे बघा, मी आलोवतो आपल्यालाच काही प्रश्न विचारायला आणि चाललंय काय बघा ! आपणच मला प्रश्न विचारताय ! गंमतच आहे झालं ! अहो,आपल्यासारख्या त्रिकालदर्शी खडकसाहेबांनी कसं आम्हा माणसांच्या मदतीला आलं पाहिजे. आमचे काही प्रश्न असतात. जनतेचे प्रश्न असतात. देशाचे प्रश्न असतात. पोटासारख्या क्षुल्लक गोष्टींचं काय घेऊन बसलात ! पोट काय, असतंच प्रत्येकाला ! माकडाला नसतं का शेपूट !

खडकः ते पिरगाळत नेल्यावर काय होऊ शकेल, याचाही प्रत्येक माकडानं विचार केला पाहिजे !

मंत्रीः च्यायला ! तुम्ही म्हणजे अगदी आमचं मूर्तिमंत दैव असल्यासारखंच बोलताय !

खडकः मग ! वस्तुस्थितीच आहे ती ! तुझा सगळाच्या सगळा भूतकाळ आणि सगळाच्या सगळा भविष्यकाळ गोठून तुझ्यापुढं उभा आहे. वर्तमानकाळाचा आणि तुझा आजपर्यंत कधीही संबंधच आलेला नाही. तेव्हा तो प्रश्न नाही.

मंत्रीः हां, तर माझा प्रश्न असा होता की, मी आहे मतस्वातंत्र्याचा एक जहाल पुरस्कर्ता आणि त्याचबरोबर, माझा शिस्तीलाही कट्टर पाठिंबा आहे... तर माझं काय होईल ?

खडकः मला ते स्पष्ट दिसतंय, पण मी ते सांगणार नाही !

मंत्रीः हे खडका, आम्ही मंत्री आहोत आणि याचा सूड घेऊ शकतो, याची तुला जाणीव आहे काय ?

खडकः तू सूड घेण्याचा प्रयत्न केलास किंवा केला नाहीस, तरी हे बाळा, मी आहेच !कठीण,कर्कश आणि ठाम !

मंत्रीः अस्सं काय ! ठीक आहे ! तुला फोडून तुझ्या तुकड्यांचा नाही एक तुरुंग बांधला तर आपलं डोकं मंत्र्याचं नाही ! बधून घेतो !( मंत्री तरातरा निघूल जातो. खडाकातून मंदसा हसण्याचा आवाज. रंगभूमीवर अंधार. पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा अविनाश -- वय तीस, सुलभा -- त्याची बायको.)

अविनाशः हं ! शेवटी एवढ्या लांब येण्यालाही काही अर्थ नाही ! शेवटी प्रश्न ते प्रश्न ! एखाद्या खडकासारखे साक्षात आणि सतत अस्तित्वात असलेले !

सुलभाः ए, हे असलं उदासीनपणाचं काही नको बाबा ! बघ नं कसे आजूबाजूला डोंगर पसरलेत. दूरपर्यंत...

अविनाशः सुलभा, हा उदासीनपणा नव्हे. कुठल्याही खऱ्या गोष्टीत कसलाही ' पणा ' नसतो; तिचं उभं राहणं किवा अस्तित्वात असणं हे कुठल्याही कण्यावर अवलंबून असत नाही आणि ही गोष्ट नाकारून, नुसतं क्षितिजापर्यंत पसरलेल्या डोंगरांच्या रांगांत हरवावं म्हटलंस तर ते मला जमणार नाही !

सुलभाः अवी, तू दिवसेंदिवस कुढा होत चाललायस ! रुक्ष होत चाललायस !( अविनाश मंदसे हसतो.) आणि बेफिकीरही होत चाललायस !

अविनाशः हंऽ ! खरंय तुझं म्हणणं ! पण तुझ्या या सगळ्या म्हणण्याचा अर्थ मी सांगू का ? -- मी अनाकर्षक होत चाललोय !

सुलभाः मी असं म्हटलेलं नाही ! पहिल्यांदा तू मला जितका आवडलास तितकाच आताही आवडतोस !

अविनाशः हो, पण माझ्यात खूप फरक पडलेला आहे; तेव्हा तुझं हे म्हणणं खरं असण्याची शक्यता कमीच !

एखादी गोष्ट जशी आहे तशी ती नाही असं समजून राहण्याच्या प्रयत्नात काही अर्थ नाही.

सुलभाः तुझ्या या गुंतागुंतीत मला रस नाही. पण मला तू फार फार आवडतोस, हवासा वाटतोस हे मात्र खरं आहे. वाटतं की, तू खूप लिहावंस. मोठमोठ्या कलाकृती निर्माण कराव्यास आणि --

अविनाशः ( हसतो. ) सुलभा, प्रश्न आहेत ते हेच. मी ल्याह्यचं तरी का आणि कलाकृती तरी कशासाठी निर्माण करायच्या ? लौकिक वगैरे सगळं भ्रामक आहे. एका वेळी आपण जास्तीत जास्त एकाच व्यक्तीला माहीत असू शकतो. अशा सगळ्या व्यक्तींचा एकत्रितपणे विचार करणं म्हणजे शुध्द मूर्खपणाच ! शिवाय हा काही महत्त्वाचा मुद्दाही नाही. सुलभा, पूर्वी जे कधी माझ्या डोक्यातही आलं नव्हतं ते मी आता ठामपणे म्हणतो -- कला म्हणजे माणसाच्या चलाख मेंदूनं उभा केलेला प्रचंड भ्रम आहे । कुठल्याही गोष्टीच्या स्पष्ट, स्वच्छ अस्तित्वापेक्षा, तिच्या सौंदर्याला वा कुरूपतेला किंवा तिच्या मांडणीला महत्त्व आणणं, ही एक महान फसवणूक आहे ! कुठलीही कलाकृती म्हणजे केवळ असत्य. कारण ती कला असते आणि आकृतीही असते. कलात्मक कृती असते. कुठलंही सत्य कलात्मक असत नाही. सत्याच्या बाबतीत कला, सौंदर्य, कुरूपता या गोष्टी अप्रस्तुत असतात आणि या गोष्टी अप्रस्तुत असल्या तरी त्यात रमणं हा माणसाचा स्वभाव आहे, असं त्याचं समर्थन करणं -- यामध्ये दुसरं--तिसरं काहीही नसून भेकडपणातून येणारा बेगडीपणा आहे. कला ही अपरिहार्यपणे एक उपभोगाचीच गोष्ट राहणार आणि मला कसलाही कुंटणखाना चालवायची इच्छा नाही !

सुलभाः कठीण आहे बाबा तुझ्याबरोबर बोलणं ! मला आपलं वाटलं की, तुझ्यात लिहिण्याची प्रचंड क्षमता आहे आणि आजपर्यंत तू ते जगाला दाखवूनही दिलेलं आहेस. तर तू लिहावंस, एकाहून एक अवघड भराऱ्या घ्याव्यास, कलेची क्षितिजं गजबजून टाकावीस.

अविनाशः आणि अशा कलावंताची बायको होण्याचं भाग्य तुला लाभावं !

सुलभाः ( चिडते ) अविनाश ! तू मला काय एक कर्तृत्वशून्य बाहुली समजतोस की काय ! तुझ्यासारख्या लहरी माणसालासुध्दा मी मोहात पाडलेलं आहे हे विसरू नकोस !

अविनाशः ( समजावीत ) रागावू नकोस सुलभा, पण खरंच मला न लिहिण्याची मोकळीक हवीय. या कलेबिलेतून मला मुक्त व्हायचंय. माझ्या क्षमतेचंच एक बंधन होऊ पाहातंय, त्यातून सुटायचंय मला. एक तू तरी माझ्या बाजूला उभी रहा... ( खडकातून हसण्याचा आवाज. दोघेही इकडे तिकडे पाहातात.)
...कुणीतरी हसतंय...हसतंय कुणीतरी...हास्यास्पद झालोय मी ...हास्यास्पद...पण त्या झगड्याचं मोल मला माहिती आहे...कोणत्या स्वातंत्र्यासाठी मी ही किंमत देतोय तेही मला माहिती आहे..तुम्ही मला हसा...लहरी म्हणा, पण मी हा झगडा सोडणार नाही...मी झगडतच राहणार... झगडतच राहणार...( तो तेच तेच वाक्य पुन्हा पुन्हा म्हणतोय. ती त्याला " ए चल बाबा इथून ..." म्हणत घेऊन जाते. ओढत. तो तेच ते वाक्य म्हणत इकडे-तिकडे पाहात...जातात.... तिन्ही विदूषक रंगमंचकावर येतात. नावि आल्या आल्या एक दणदणीत ढेकर देतो.)

लोविः अरे, काय तू मधल्या वेळात आमचे डोळे चुकवून ' स्टार आफॅ महाराष्ट्र ' मधे जाऊन आलास की काय ? एवढी बुलंद ढेकर देतोयस तो ? तुझ्या पण आयला नमस्कार साला !

नाविः अरे, नाही रे बाबा. खरंच पोटात अगदी भुकेचा डोंब उसळलाय.

लोविः तरीच तुझा हा अभिनय इतका बुलंद झाला ! छान ! तुझ्या पोटातला डोंब गगनाला गवसणी घालण्याइतका भडको ! कारण, दुसरं काहीही करण्याची तुला अक्कल आणि ताकद दोन्हीही नसल्यामुळं, तुझा अभिनयच त्यामुळं अधिकाधिक चांगला होत जाईल, याची मला खात्री आहे. (सविला ) चलो सर्कस, थोडी प्रार्थना करू.( लोवि हात जोडून नम्र होतो. सवि एक हात आणि एक पाय असा मिश्र नमस्काराच्या पोझमध्ये.) हे कालीदासाच्य कालीमाते--

सविः हे कालिदासाच्या कालीमाते -

लोविः आमचे मित्र नाटकातले विदूषक --

सविः नाटकातले विदूषक --

लोविः यांच्या पोटातला भुकेचा डोंब --

सविः हो --

लोविः असाच उत्तरोत्तर भडकत जाऊन, आमची नाटकं अधिकाधिक रंगत जावोत आणि लोकांची पोटं हास्यानं भरून फुलाफळांनी बहरून जावोत !

सविः हो. ( नमस्काराच्या अवघड पोझमधून कोसळतो. उठून सावकाश लोविकडे येतो. एकदम त्याच्या पार्श्वभागवर काठी वाजवतो.) यापुढच्या प्रयोगात ही प्रार्थना इतकी मोठी आपल्याला चालणार नाही, सांगून ठेवतोय ! आमच्या पण शरीराचा विचार करा जरा ।

लोविः मुळात ही प्रार्थना मोठी नाही आणि तू पडलास याचं कारण प्रार्थना नसून, तुझा तो अवघड नमस्कार आहे ! साली सर्कस म्हंजे काय इतकं औट नाही असायला पायजेलाय !

सविः कष्टसाध्य नमस्कारातूनच देवता प्रसन्न होतात, असं आमचे बापजादे सांगून गेलेले आहेत, तेव्हा आम्ही कष्ट हे करणारच...फक्त त्यातली जरा लिमिट ध्यानात ठेवा, एवढंच आमचं म्हणणं...!

लोविः धन्य तुझा तो बाप ! त्यानं इतके कष्ट करूनही त्याचे चिरंजीव आपण, हे असे एवढेसेच निपजलात...आणि तुमच्या हातात ही पिचकी काठी आली !

नाविः अरे बाबा, तुम्ही या एवढ्या अवघड अवघड गोष्टी कशाला बोलताय... कोण कुणाचा सूड घ्यायचं ठरवून गेलाय...कुणाला कशातून मुक्त व्हायचंय...कोण प्रार्थनेचं तत्त्वज्ञान तपासतोय...अरे कशाला...माझा प्रश्न त्याहून कितीतरी सोपा आहे...काहीतरी खायला द्या मला...तुमच्याही पुण्यसंचयात थोडी भर पडून जाईल...

लोविः आमच्या पुण्यसंचयात भर पडावी, अशी सदिच्छा व्यक्त केल्याबद्दल देव तुला स्वर्गात स्थान देवो !

सविः आणि अशी इच्छा व्यक्त केल्याबद्दल देव तुला ( काठी मारून ) नरकात पाठवो !

नाविः आणि अशी वाईट इच्छा बोलल्याबद्दल देव तुला पुन्हा स्वर्गात -- नाही आपलं नरकात पाठवो !

सविः आणि ही वाईट इच्छा बोलल्याबद्दल देव मघाशी तुला जे स्वर्गात स्थान देणार होता, ते आता न देवो !

लोविः च्यायला, म्हणजे सगळं पुन्हा पयल्यासारखं झालं !

नाविः तर मला खायला द्या नं काही तरी !
( आता आधीचे सगळे संवाद पुन्हा म्हणावे लागणार की काय, या धास्तीने लोवि -- सवि बघतात.)
नाही, हे सगळे संवाद आता पुन्हा म्हणावे लागणार नाहीत, कारण आता मी पुण्यसंचयाचा विषय काढलेला नाही.

लोविः हां, पण हे बघ, आता इथं एक सभा होणार आहे. शामकांत तुपे अध्यक्ष आहेत. काय ! तेवढी सभा संपेपर्यंत जऽरा कळ काढ ! अं । हं । शहाणा आहे आमचा नाटकवाला ! अं !

सविः ( दोघांनाही फटाफट काठ्या वाजवून -- ) चला, चला, लोक जमायला लागले.

लोवि : आणि हे बघ नाटकवाल्या, सभेच्या शेवटी आपली तिघांचीही भाषणं आहेत ; आपण ते ऐनवेळी जाहीर करणार आहोत, काय ! तर तोपर्यंत तू मुद्दयांची जुळवाजुळव करत बस ! अं !

नाविः ( काकुळतीने ) अरे बाबा, उपाशीपोटी मुद्देबिद्दे कुठले रे ! कसं शक्य आहे ते !

लोविः गुड ! हा सुध्दा एक मुद्दाच आहे ! ते आता सगळं तू तुझ्या भाषणातच मांड, काय ! अं !
( खुर्ची टेबल येते, सवि खुर्ची मांडायला जातो, ती पडते. ती ठेवायला जातो, तो पडतो. मग टेबल पडते. हे, ते लोक जमतात. मंत्रीमहाशय तुपे येऊन अध्यक्षासनारूढ होतात. थोडा वेळ गलबला. मग अध्यक्ष उभे राहतात. गलबला हळूहळू कमी होतो.)

मंत्रीः ( उभा राहून ) आज आपण इथं जमलेले आहेत ते आपणा सर्वांच्या आयुष्यात एक पेचप्रसंग आलेला आहे म्हणून. हा खडक आपल्याला दिसतोच आहे आणि त्याबद्दल आता आपल्याला पुरेशी माहितीही झालेली आहे. आपली सर्वांची आयुष्यंच्या आयुष्यं या खडकात गोठून गेल्यासारखा हा प्रकार आहे. यातून अनेक प्रश्न निर्माण झालेले आहेत. तर त्या सर्वांचा आज आपण इथं विचार करणार आहोत -- त्यांची चर्चा करणार आहोत -- आणि त्यातून काही मार्ग निघतो का ते पाहणार आहोत -- आणि मला निश्चितपणे असं वाटतं की, आपली सर्वांची संघटित शक्ती यातून सहज मार्ग काढू शकेल ! ( टाळ्या.) तर आता मी एकेकाला त्याचे विचार मांडण्यासाठी पाचारण करतो. प्रथम आपले सुप्रसिध्द नाटककार अनंत मुंगी बोलतील. (टाळ्या. )

मुंगीः मला एकच पण अतिशय महत्त्वाचा मुद्दा मांडायचा आहे. मला इथं ठामपणे असं वाटतं की, या खडकामुळं माझ्यासारख्या लेखकाची फार कोंडी होणार आहे. मी एक शोकांतिकाकार आहे, हे तुम्ही जाणताच. आणि शोकांतिकेला कर्तृत्ववान माणूस आणि त्या ' माणसाच्या ' कृतीतूनच ओढवणारा नाश कसा लागतो, तेही आपल्याला माहिती आहे. आता ग्रीक ट्रॅजेडीबद्दल मी काही सांगायला पाहिजे असं नाही. आपण जाणताच. तर अशा एखाद्या खडकामुळं, माणसाच्या कृती या माणसाच्या राहूच शकणार

नाहीत आणि सगळं एका दगडाच्या वर्चस्वानं ठरून चाललंय म्हटल्यावर आपल्या आयुष्यात शोकाला काही स्थानच राहाणार नाही. आणि असं आयुष्य आपण जगू इच्छितो काय ? इथं शोकांतिकेचाच अंत होण्याचा धोका आहे. म्हणजे ज्याला आपण डेथ ऑफ ट्रॅजेडी म्हणतो तसं हे होऊन बसेल. असल्या आयुष्याची आपण काय किंमत करू ? लेखकाचं शोकांतिका लिहिण्याचं स्वातंत्र्य हिरावलं जाणं, ही गोष्ट कितपत हितकारक आहे ? माणसाच्या संस्कृतीचा विचार करताना निश्चितच आपल्याला या प्रश्नाचं उत्तर द्यावं लागणार आहे. तूर्त मला एवढंच बोलायचं आहे. ( जाऊन बसतो.)

मंत्रीः आपणा सर्वांच्या सुदैवानं इथं विरोधी पक्षाचे एक नेतेही उपस्थित दिसताहेत. त्यांनाही बोलायची संधी देणं, हे मी माझं कर्तव्य समजतो. श्रीयुत अंबर देसाई !

देसाईः मित्रहो, विषय फारच महत्त्वाचा आहे ही एक चांगली गोष्ट आहे. त्यामुळं सत्तारूढ पक्षाला कोणताही निर्णय न घेता, विचार--चर्चा यांमध्ये कालापव्य करणं कठीण आहे. काहीतरी एका निश्चित निर्णयाप्रत आपल्याला पोचावंच लागणार आहे. एक निश्चित दिशा ठरवावीच लागणार आहे. दुसरी एक महत्त्वाची गोष्ट मला इथं स्पष्ट करावीशी वाटते ती अशी की, हा खडक काही आज अस्तित्वात आलेला नाही. माणसाच्या इतिहासाइतकाच या खडकाचा इतिहासही विशाल आणि विविध प्रश्नांनी, तसंच विविध परिस्थितींनी भरलेला आहे. त्याचं अस्तित्व आज आपल्याला प्रकर्षानं जाणवू लागलेलं आहे एवढंच. मला सांगायचं आहे ते इतकंच की, माणूस तसा एक कमकुवत प्राणी आहे. तो काही ना काही स्वीकारून --धरून चालणारा प्राणी आहे आणि ही परिस्थिती एकदा ओळखल्यानंतर आपण शोकरसाच्या अस्तित्वाला पहिला नंबर देणार आहोत, की माणसाच्या प्राथमिक सुखांना ? स्वातंत्र्य ही काही संपूर्ण चीज नसते, त्यातही निवडीचा भाग असतोच. मग प्रथम तुम्ही संस्कृतिसंरक्षणाचं स्वातंत्र्य मागणार, की जगण्याचं ? आणि या प्रश्नाचं उत्तर एखाद्या पक्षाच्या नेत्यांनी द्यायचं नसून सर्वसामान्य जनतेनं द्यायचं आहे, ही गोष्ट मी इथं ठामपणे सांगून ठेवू इच्छितो. आणि दुसरंही एक सांगून ठेवतो की, आपल्याच उत्तरावर या खडकाचं स्वरूप ठरणार आहे. फक्त खडकाचं स्वरूप आपण ठरवू शकतो पण खडकच नाहीसा करावा अशी जर भूमिका कोणी घेणार असेल, तर ती संपूर्णपणे अव्यवहार्य आणि म्हणूनच मूर्खपणाचीही ठरेल. खडक हा राहणारच. नव्हे, तो राहिलाच पाहिजे !( आपल्या जागेवर जाऊन बसतो.)

मंत्रीः आता आपले सुप्रसिध्द धर्ममार्तंड आणि नीतीतत्त्ववेत्ते पंडित विश्वेश्वर शास्त्री बोलतील.

नाविः ( असह्य होऊन किंचाळून उठतो.) नको ऽऽ नको नको नको ...

लोविः ( दाबून त्याला खाली बसवत ) थांब रे. झालंच !

वि.शास्त्रीः कुठलाही माणूस हा या पृथ्वीवर स्वयंभूपणे टपकलेला नसतो. त्याच्या आधीही अनेक माणसं इथं जगून गेलेली असतात. त्यांच्या कर्मातूनच पुढचा नवा माणूस आपले नवे मार्ग आखीत असतो. परंपरेचे पाश कुणालाही सुटत नसतात. आणि हे पाशही तसे आवश्यक आणि उपकारकच असतात. कारण परंपरेशी जोडून असण्यात धोके कमी असतात -- माणूस अधिक निर्भय राहू शकतो. तेव्हा माणूस या नात्यानं फार तर तुम्ही परंपरेचं यशापयश जोखू शकाल -- तिचं मूल्यमापन करू शकाल -- पण ती संपूर्णपणे नाकारून अलिप्त होऊ पाहाल तर मृत्यू दूर नाही, इतकंच मला सांगायचं आहे. थँक्यू !

मंत्रीः आपले सुप्रसिध्द कादंबरीकार अविनाश यांच्या पत्नी काही बोलू इच्छित आहेत असं दिसतं .

सुलभाः एखाद्याला जर ल्याह्यचं नसेल तर त्याच्या व्यक्तिमत्वाच्या आतूनही आणि बाहेरूनही त्याला ते स्वातंत्र्य मिळण्याची मोकळीक आपल्या शासनानं करून द्यावी, एवढीच माझी विनंती आहे.

( यावर कडकडून टाळ्या पडतात -- इतक्या की या टाळ्या तिच्या वाक्याला पडल्या, की आणखी कशाला, याची शंका यावी.)

मंत्रीः ठीक आहे. आणखी कुणाला काही बोलायचं आहे काय ? ( सुहास्यवदनाने इकडेतिकडे पाहतात.)

नाही ? ...अं ?... ठीक आहे. आजच्या या विज्ञानयुगाचा विचार करता त्यांच्यापैकी -- म्हणजे शास्त्रज्ञांपैकी कुणी इथं हजर असतं तर मला विशेष आनंद झाला असता-- पण ठीक आहे. मी आता माझे स्वतःचे विचार मांडतो. आतापर्यंत इथं अनेकांची भाषणं झाली. कुणी काय म्हणालं, कुणी काय म्हणालं. पण या सगळ्यातून ज्या एका महत्त्वाच्या मुद्यावर भर दिला जायला पाहिजे होता तो दिला गेलेला नाही ; मी फक्त तेवढंच करणार आहे. माणसाच्या आयुष्याच्या सगळ्या दोऱ्या एका कुठल्यातरी ठिकाणी केंद्रित होणं, हे आपल्याला मान्य आहे काय ? एक लोकशाहीनिष्ठ समाज म्हणून आपल्याला हे कितपत स्वीकारार्ह वाटतं ? आम्ही पैसे खाल्ले -- जनता आम्हाला जोडे मारेल. आम्ही भ्रष्टाचारानं

वागलो -- जनता आमचा कान धरेल. आम्ही अन्यायानं कारभार केला - जनता आम्हाला दूर करील. मी इथं असं विचारतो --( एकदम आवाज चढवून ) हा खडक कोण ? याचा आमचा काय संबंध ? आम्ही फक्त एक जनता मानतो आणि दुसरं म्हणजे आपलं राष्ट्र मानतो. पण हे काय ?( क्षणभरानं --)आता एक गोष्ट खरी आहे की, उपाशीपोटी जनतेला राष्ट्रवाद सांगणं बरोबर नाही --( इथं अनपेक्षितपणे एकटा नावि कडकडून टाळ्या वाजवतो. त्याच्या वाजवून झाल्यावर मग इतर सगळेच, एकदम लक्षात आल्याप्रमाणे, कडाडून टाळ्या वाजवतात.) -- हे काही आपल्याला माहीत नाही असं मुळीच नाही. पण सर्व गोष्टींच्या साकल्यात्मक विचारातूनच आपला प्रगतीचा मार्ग ठरत असतो, समाज पुढे जात असतो, हेही आपल्याला विसरता येणार नाही. थोडक्यात म्हणजे मी आपल्याला इथं इतकंच सुचवू इच्छितोय की, या खडकाचं अस्तित्व हे आपल्या समाजाचा विचार करता अत्यंत कृत्रिम, अनावश्यक आणि घातकही आहे. तेव्हा हा विचार मनात पक्का धरूनच आपण पुढला विचार केला पाहिजे.( क्षणभरानं -- ) आता दुसरी एक गोष्ट अशी की, आपल्या समाजातील गुन्ह्यांची वाढती संख्या लक्षात घेता, आपल्याला एका मोठ्या तुरुंगाचीही आवश्यकता आहेच, आणि या खडकाचा दगड त्या दृष्टीनं आपल्याला फारच उपयोगीही ठरण्यासारखा आहे. या सर्व गोष्टींचा विचार करता, हा दगड फोडून टाकण्याशिवाय मला तरी दुसरा पर्याय दिसत नाही. आणि लोकशाही मानणारे सगळेच लोक माझ्या पाठीशी आहेत याबद्दल मला तिळमात्रही संदेह नाही ! तर लोक हो, मला वाटतं हे सगळं तुम्हाला पटलेलं आहे. आता आपल्याला एक घोषणा द्यायची आहे --मी सांगेन आणि मग सर्वांनी एकमुखानं ही घोषणा करायची आहे.

बोला, ' हा खडक ताबडतोब --'

( जनता तसे ओरडते. )

' नष्ट झालाचा पाहिजे !'

( जनता तसे ओरडते. )

'नष्ट झालाच पाहिजे !'

( जनता तसे ओरडते. )

'नष्ट झालाच पाहिजे !'

( त्या गजरात धावपळ सुरू होते. देसाई, सुलभा, अविनाश, शास्त्री निघून जातात. लोक कुदळी, फावडी वगैरे हत्यारे घेऊन येतात. दगडावर वार सुरू होतात. मंत्री उत्साहाने त्यांना प्रेरणा देत इकडेतिकडे भिरभिरू लागतो. एका कडेला तिन्ही विदूषक शांतपणे बसलेले आहेत -- लोविच्या मांडीवर डोके टाकून सवि झोपी गेलेला आहे.) शाब्बास ! चालू द्या ! हा एक अपरिहार्य झगडा आहे ! गो ऑन !( मंत्री स्वतः एक कुदळ घेतो आणि वार सुरू करतो. सगळ्या वारांचे मिश्र आवाज आणि ठोके मारतानाचे सगळ्यांचे निःश्वास .. हे थोडा वेळ चालू राहाते.)

मजूरः ( धावत येतो. घामाघूम झालेला.) साहेब, साहेब. या दगडाचा एक कपचाबी उडत न्हाई ! कायतरी इपरितच हाय !( हळू हळू सगळेच थांबतात. मंत्र्याकडे बघतात.)

मंत्रीः दिसतंय - मलाही दिसतंय -- पण अंतिम विजय सत्याचाच होईल, यावर माझी ठाम श्रध्दा आहे ! आपण जी तत्त्वं स्वीकारून हे आरंभलेलं आहे, त्यांच्याशी आपण कुठल्याही परिस्थितीत प्रामाणिक राहायला पाहिजे. चला, कार्यात खंड पाडू नका -- ( पुन्हा सगळे कामाला लागतात. नंतर बराच काळ दर्शविण्याच्या दृष्टीने प्रकाशाची उघडझाप. यात हळूहळू काही काही व्यक्ती गळाठून मरून पडताहेत. प्रकाश स्थिर होतो. शेवटची एकदोन माणसेही सावल्या पडाव्या तशी जमीनदोस्त होतात. शेवटी मंत्रीही शेवटचे आचके देत कोसळतो. काही क्षण शांतता. मग विदूषक उठतात. लोवि सविवर त्याच्याच काठीचा उपयोग करून त्याला जागा करतो. सवि डोळे चोळत जागा होतो.)

लोविः ए, ऊठ ! आता आपली बारी आली बघ ! साली इतकी भाषणं झाली, कार्याची झुंबड उडाली, आणि तू साला झोपलेला ! धन्य आहे तुझ्या तटस्थपणाच्या अलिप्तपणाची !( लोवि नाविलाही एकदा काठी मारतो आणि मग ती सविच्या हातात देतो. नावि गळाठलेला. एकेक पाऊल टाकत, " बासुंदी चांगलीच होती हो " म्हणत पुढे येतो .) ए, बासुंदी ! आता नाटकातले संवाद बास. आता जरा गंभीर हो. गंभीर म्हणजे सीरियस -- नाही, आपलं सीरियस म्हणजे गंभीर.( एकदम विचारात पडून ) पण साला एक प्रश्न आहे. आपण साले जन्मजात विदूषक ! सीरियस होणारच कसे ! आपल्याला सीरियस होता यावं म्हणून

आपल्या विचारविनिमयाच्या वेळी, अध्यक्ष वगैरे हास्यास्पद गोष्टी आपण बाजूला ठेवू.( हे वाक्य म्हणून संपताच एकदम जाऊन मंत्र्याचे प्रेत बाजूला ठेवून येतो.) हां, आता सुरू.

सविः ' सुरू '!

नाविः ना -- नाही -- नुसतं सुरू.

लोविः आता श्रोते आणि प्रेक्षक अस्तित्वात नाहीत, हे खरं आहे. पण आपण भाषणं करायचं ठरवलेलंच आहे, तर तो होऊन जाऊ द्यात. प्रथम आमचा छोटा दोस्त सर्कशीतला विदूषक !( लोवि टाळ्यांच्या अपेक्षेने नाविकडे पाहतो. त्याच्यात त्राण नाही. मग स्वतःच पुढे येऊन बसतो आणि टाळ्या वाजवतो.)

सविः मला शब्दांच्या भाषेत बोलता येत नाही म्हणून मी सर्कशीतला विदूषक झालो आणि माझ्या विचारांच्या ऊंचीचं प्रतीक म्हणून मला बूटकं व्हावं लागलं. या दोन्ही गोष्टींचा विचार करता खरं म्हणजे मला तासंतास बोलत राहण्याचा अधिकार आहे. पण मी तसं काही करणार नाही. कारण आमचा एक मित्र भुकेला आहे -- ( इथे नावि ' होय रे ' करतो.)-- आणि दुसरा फारच शहाणा असल्यामुळं त्याची मला पर्वा नाही. आणि तिसरी गोष्ट म्हणजे माझ्या डोळ्यांवरची झोप अजून उडालेली नाही. तोवर मी जाऊन झोपलो तर पुन्हा शांतता नांदण्यासारखी आहे. मला सांगायचं होतं ते इतकंच की, भाषणाबिषणांना फार महत्त्व देऊ नका-- ती अजिबात सीरियसली घेऊ नका आणि झोपणाऱ्याला झोपू द्या. ( जाताजाता थांबून ) मी खडकाबिडकाच्या विषयावर काहीतरी बोलेन अशी तुमची अपेक्षा असणार, हे मला माहित होतं. म्हणूनच मी त्या विषयावर बोललेलो नाही. (सवि येऊन आपल्या जागेवर बसतो आणि मग अंग पसरायला लागतो. लोबि त्याला धरून ठेवतो. जबरीने बसायला लावतो.)

लोविः आता आमचे सुग्रास दोस्त -- नाटकातले विदूषक ! ( पुन्हा स्वतःच टाळ्या वाजवतो.)

नाविः नाही रे बाबा. नको.( नावि उठायला तयार नाही. लोवि जाऊन त्याला बळजबरीने उठवतो आणि ढकलतो. तोवर इकडे सवि आडवा होतो. घाईघाईने लोवि सविला बसता करतो.) मला भाषण करायलाच पाहिजे म्हणता तर करतो बापडा. पण आतापर्यंत मला फक्त एकच मुद्दा सुचलेला आहे -- आणि तो म्हणजे, भुकेल्याला खायला द्या. मी भुकेला आहे... एवढं बोलून मी...मी...मी...(बेशुध्द पडतो.)

लोविः अरे, अरे,अरे, हं ऽऽ ! हा बेशुध्द पडला वाटतं ?

( इकडे सवि अंग टाकतो.)

घ्या ! आणि तो झोपी गेला ! असो ! म्हणजे आमचं भाषण सगळ्यांत शुध्द होणार असं दिसतंय ! श्रोत्या-प्रेक्षकांनी बरबटलेल्या भाषणांपेक्षा अशी शुध्द भाषणं -- ऊर्फ स्वगतंच अधिक अर्थपूर्ण असतात,तर सुरू.( क्षणभरानं -- ) माणसाच्या ऐतिहासिक, धार्मिक, राजकीय वगैरे वगैरे सश्रमतेला आमचं त्रिवार वंदन ! कारण, कुठल्याही विनोदी गोष्टीला आम्ही वंदन करतोच ! माणसाची सश्रमता ऊर्फ कष्टाळू नेचर झिंदाबाद ! पण आमच्या दोस्ताची भूक काही विनोदी म्हणता येणार नाही. तर तिला वंदन वगैरे करायच्या भानगडीत न पडता, त्याला घेऊन ' स्टार ऑफ महाराष्ट्र ' मध्ये जातो. म्हणजे तो शुध्दीवर येईल...आमचं छोटं पाखरू झोपलंय ते झोपू द्या...( लोवि नाविला उभा करून सावकाश जायला लागतो. जाताजाता प्रेते पाहून...) कशाच्या विरुध्द होता रे बाबांनो तुम्ही ? ... खूप प्रयत्न केलेत...खूप कष्ट घेतलेत... (क्षणभरानं -- ) यांच्या सगळ्यांच्या व्यक्तिमत्वांचे पुतळे बांधले जावोत -- हीच शुभेच्छा रे बाबा !... चला...( ते तसे जात असताना -- )

... पडदा पडत जातो ...



पत्ता -चं.प्र.देशपांडे,
३, स्नेहदीप अपा. चिंतामणीनगर,
सहकारनगर नं.२, पर्वती,
पुणे - ४११ ००९.
**दूरध्वनी - ४२२ ७८४७.**